कीच०—जिवंत राहून द्रौपदीचा गुलाम होण्यापेक्षां युद्ध करून जिवंत राहिलों, तर द्रौपदीला माझ्या रंगमहालांत ठेवीन.

भीम०—आपला रंगमहाल आतां गिधाडांच्या वस्तीत.

कीच०—खरा क्षत्रीय असशील तर गदायुद्ध—

भीम०—गदायुद्ध ? आतां काय म्हणून गदायुद्ध ?—ज्या चिलटाचा चुटकी वाजवून प्राण घ्यावयाचा त्याच्याकरितां कोण गदा आणीत बसतों !—धर्मराज, जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं.—द्रौपदी, कीचक-वधाशिवाय पांडवांना गत्यंतर नसल्यामुळें मी ह्याला आतां यमसदनास पाठवितों. (छातीत बुक्की मारतो. कीचक मरून पडतो.) चल, द्रौपदी, ह्या वनांतून शहरांत जाऊं व धर्मराजांचें दर्शन घेऊन पुढें काय करावयाचें तें ठरवूं.

सैरं०—पण प्राणनाथ, आपण येथें केव्हां आलात, तें अगोदर सांगायचें होतें.

भीम०—कीचकवधासंबंधानें धर्मराजांची शेवटची आज्ञा ऐकून मी वनाकडे आलों. वनांत कोणी निशाचरानें चुकून मला पाहिलें तर दैवी चमत्कारानें कीचक मारला गेला असें त्याला वाटावें म्हणून वनाजवळ येतांच मी भैरवाचें सोंग घेतलें.—इतक्यांत रथांत किरीट वगैरे फेकून देऊन सडसडीत होऊन जंगलांत घाईघाईनें शिरतांना कीचकाला मी पाहिलें. तेव्हां जलदीनें पुढें येऊन तू मूच्छित असतांनाच भैरवाला उचलून आंत ठेऊन (भैरवाची मूर्ति आंतून आणतो) ह्याच्या जागीं मी उभा राहिलों व जीवदानास कीचक सत्पात्र आहे किंवा कसें, ह्यासंबंधानें धर्मराजांनी सांगितल्याप्रमाणें त्याची परीक्षा करण्याकरितां तुम्हां दोघांचा संवाद ऐकत होतों. (भैरवाची स्थापना करून) द्रौपदी, ह्या भैरवाला नमस्कार कर. (दोघेहि नमस्कार करतात.) हा प्रसाद ललाटाला लाव. (दोघेहि शेंदूर कपाळाला लावतात.) चल, द्रौपदी, धर्मराजाला ही सर्व हकीकत कळवूं. (जातात).

अंक पांचवा समाप्त.

कीचक वधाचे दृश्य घाईघाईने केले आहे मुळीच पटण्यासारखे नाही

शेवट स्वाभाविक वाटत नाही. केवळ नाटकाड आणून असेच सोडल्याचे Impression होते. नाटकाच्या उत्कर्षाच्या दृष्टीने प्रभावी शेवट वाटत नाही

# खाडिलकरांच्या लेखांचें संकलन

## (१) पहिलें महायुद्ध—

भाग १, २ व ३ किंमत प्रत्येकीं १॥ रुपया; भाग ४–५ वा किंमत २ रुपये.

## (२) लेखसंग्रह–भाग १

किंमत ६ रुपये

या ग्रंथात खाडिलकरांच्या १८९६ ते १९१० दरम्यान नियतकालिकात प्रसिद्ध झालेल्या निवडक लेखांचा संग्रह आहे.

## लेखसंग्रह–भाग २

किंमत ६ रुपये.

या ग्रंथात खाडिलकरांचे १९१८ ते १९२९ पर्यंतचे निवडक लेख व अध्यक्षीय भाषणे दिली आहेत.

## (३) श्री. खाडिलकर– चरित्र–किंमत ४ रुपये.

लेखक—काशिनाथ हरि खाडिलकर पृष्ठें ३६८.